**शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून राज्यात व्यावसायिक औषधनिर्माणशास्त्र पदविका अभ्यासक्रमांच्या खाजगी नवीन संस्था सुरु करण्यास अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने शासन मान्यता देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**

**शासन निर्णय क्र.मान्यता-२०१८/(प्र.क्र.१३३/१८)तांशि-५**

मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,

हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०००३२.

दिनांक: ०८ जून, २०१८.

**संदर्भ :** संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक १०/एनजीपी//एआयसीटीई/मान्यता/२०१८/४४९, दिनांक १५.०५.२०१८.

**प्रस्तावना :-**

अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांचेकडून शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून राज्यात व्यावसायिक औषधनिर्माणशास्त्र पदविका अभ्यासक्रमाच्या नवीन खाजगी संस्थांना मान्यता देण्यासंदर्भात दिनांक १४.०५.२०१८ रोजीच्या ई-मेल द्वारे तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्राप्त झालेल्या दुसऱ्या यादीच्या अनुषंगाने संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय यांनी संदर्भीय पत्रान्वये शासनास प्रस्ताव सादर केलेला आहे. सोबत जोडलेल्या Annexture A मधील अ.क्र. १ ते ०८ समोरील नमूद संस्थांना त्यांच्या नावासमोर दर्शविल्याप्रमाणे नवीन खाजगी औषधनिर्माणशास्त्र पदविका अभ्यासक्रमांच्या संस्था सुरु करण्यास शासन मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेस अनुसरुन सोबत जोडलेल्या Annexture A मध्ये नमूद अ.क्र. १ ते ०८ संस्थांना त्यांच्या नावासमोर दर्शविल्याप्रमाणे नवीन खाजगी औषधनिर्माणशास्त्र पदविका अभ्यासक्रमांच्या संस्था सुरु करण्यास शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

१. सदर मंजूरी कायम विना अनुदान तत्वावर राहील.

२. प्रस्तुत बाबतीत अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेने विहित केलेल्या तसेच दिनांक २१ मे, १९८३ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या अटींची पूर्तता करणे संबंधित संस्थेस बंधनकारक राहील. सदर अभ्यासक्रमासाठी संस्थेची प्रवेशक्षमता Annexture A मध्ये नमूद केल्याप्रमाणे राहील.

३. शासनाने विहित केलेल्या तसेच अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेने विहित केलेल्या सर्व अटी व शर्ती मान्य असल्याबाबत संस्थेस करारनामा करावा लागेल. तसेच संबंधित कागदपत्रांची आणि औपचारिक बाबींची पूर्तता संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्या संमतीने समाधानकारकरित्या करण्यात येईल.

४. सदर अभ्यासक्रमाच्या संलग्नीकरणासाठी संबंधित संस्थेने महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील तरतूदीनुसार संबंधित विद्यापीठाची मान्यता/संलग्नीकरण घेणे आवश्यक राहील.

५. सदर औषधनिर्माणशास्त्र पदविका अभ्यासक्रमांसाठी संबंधित संस्थेने महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळाची संलग्नता घेणे आवश्यक राहील.

६. नव्याने मान्यता देण्यात आलेल्या पदविका औषधनिर्माणशास्त्र अभ्यासक्रमाच्या संस्थाप्रमुखांनी विद्यार्थ्यांना प्रवेश देण्यापूर्वी फार्मसी कौन्सील ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांची मान्यता घेणे बंधनकारक राहील. सदर मान्यतेअभावी भविष्यात काही न्यायालयीन प्रकरणे उदभवल्यास याप्रकरणी संबंधित संस्था पूर्णपणे जबाबदार राहतील. तसे हमीपत्र संबंधित संस्थाप्रमुखांनी संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेकडे सादर करावयाचे आहे. त्यानंतरच सदर संस्थांना अभ्यासक्रम सुरू करण्यासाठी संचालनालयाने संमती द्यावयाची आहे.

७. संबंधित संस्थेने संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेकडे आवश्यक ती संचीत ठेव संयुक्त खात्यात भरुन इतर कायदेशीर बाबींची पूर्तता करावी.

८. सदर व्यावसायीक औषधनिर्माणशास्त्र पदविका अभ्यासक्रमाचे प्रवेश शासनाने मान्य केलेल्या संबंधित अभ्यासक्रमांच्या प्रवेश नियमानुसार /पद्धतीनुसार करण्यात येतील.

९. शुल्क नियामक प्राधिकरणाने विहित केलेल्या शिक्षण शुल्कापेक्षा जास्त शुल्क संबंधित संस्थांनी आकारल्यास त्या संस्थांवर महाराष्ट्र एज्युकेशनल इन्स्टिट्यूशन (प्रोहिबिशन ऑफ कॅपिटेशन फी) ॲक्ट, १९८७ अनुसार कारवाई करण्यात येईल.

१०. संस्थेने अभ्यासक्रम चालविण्यास पूर्णवेळ शिक्षकवृंद व इतर तांत्रिक कर्मचारी शासन नियमाप्रमाणे नियुक्त करावेत. त्यांना नियमानुसार वेतन व भत्ते देण्यात यावेत. तसेच शिक्षकवृंद व इतर कर्मचाऱ्यांच्या वेतन व भत्ते इत्यादीबाबत तसेच विद्यार्थ्यांकडून शासनाकडे तक्रारी आल्यास संस्थेवर कडक कारवाई करण्यात येईल.

११. संस्थेतील ग्रंथालयास आवश्यक ती पुस्तके, नियतकालिके अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेच्या मानकानुसार खरेदी करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना वाचनालयाचा पुरेपूर उपयोग होण्याच्या दृष्टीने ग्रंथालयात विद्यार्थ्यांना अभ्यासिकेची सोय करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या मानकाप्रमाणे सर्व शैक्षणिक सोयीसुविधा (उदा. प्रयोगशाळा, वाचनालय, वर्गखोल्या इ.) करणे आवश्यक आहे.

१२. रॅगिंग संदर्भात मा. सर्वोच्च न्यायालयाचे निर्देश व महाराष्ट्र प्रोहिबिशन ऑफ रॅगिंग ॲक्ट, १९९९ यांची कठोरपणे अंमलबजावणी करणे आवश्यक राहील.

१३. याशिवाय संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई व संबंधित विद्यापीठ यांनी घालून दिलेल्या अन्य अटी व शर्ती लागू राहतील.

१४.ज्या संस्थांनी संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्याकडे प्रोसेसिंग फी अदा केलेली नाही, त्या संस्थांकडून संचालकांनी अंतीम मान्यता देण्यापूर्वी ती वसूल करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०६०८११२७३७९५०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Raghunath Katkar

Digitally signed by Anil Raghunath Katkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=c3fec0b0f5c05dc9058175992109e62d3f5719b9dfb87a96579dc30c265d67ce,
serialNumber=2356d82c73e8a0c7b6da68b6511197206b94720842cda576febebf84581fc52a, cn=Anil Raghunath Katkar
Date: 2018.06.08 11:28:12 +05'30'

**(अ.र.काटकर)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालय, मुंबई /पुणे/नाशिक/नागपूर/अमरावती/ औरंगाबाद (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
३. संबंधित विद्यापीठांचे कुलसचिव, (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
४. सर्व संबंधित संस्था (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
५. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सचिव, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागास वर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
८. अतिरिक्त सचिव (तांत्रिक), भारत सरकार, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, ७ वा मजला, चंद्रलोक भवन, जनपथ, नवी दिल्ली - ११० ००१.
९. फार्मसी काऊन्सिल ऑफ इंडिया, कम्बाइन्ड काऊन्सिल्स् बिल्डिंग, कोटला रोड, एजवान-इ-गालिब मार्ग, नवी दिल्ली-११० ००२.
१०.सहायक शिक्षण सल्लागार (तांत्रिक), भारत सरकार, मनुष्यबळ विकास मंत्रालय (शिक्षण भाग), नवी दिल्ली.
११.विभागीय अधिकारी, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, पश्चिम विभागीय कार्यालय, इंडस्ट्रियल इन्शुरन्स बिल्डींग, २ रा मजला, चर्चगेट, मुंबई
१२.निवड नस्ती/तांशि-५

शासन निर्णय क्र.मान्यता-2018/(प्र.क्र.133/18)तांशि-5, दिनांक 08 जून, 2018 सोबतचे

# Annexure A

## List of New Institutes [Approved by AICTE A.Y. 2018-19]

| Sr. No. | Current Application Number | Name of Parent Organisation (Trust) | Institute Name | Institute Address | Institutes District | Institution Type | Program | University / Board | Level of Course | Course Name | Shift | Full Time/ Part Time | Intake Approved for 2017-18 | Intake Approved for 2018-19 |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | 1-3687400804 | LATE SHRI LAXMANJI MOTGHARE CHARITABLE TRUST | DR ARUN MOTGHARE DIPLOMA IN PHARMACY | KH NO 442,443,445,441/2/2,444, 446/3A,4463B MAUZA KOSRA TAH PAUNI DIST BHANDARA | BHANDARA | Unaided - Private | PHARMACY | Maharashtra State Board of Technical Education, Mumbai | DIPLOMA | PHARMACY | 1st Shift | FULL TIME | 0 | 60 |
| 2 | 1-3694226851 | SHIVAI CHARITABLE TRUST | SHIVAI CHARITABLE TRUST'S COLLEGE OF PHARMACY KOREGAONWADI TQ OMERGA DIST OSMANABAD | NEAR LAXMI PATHI, LATUR ROAD, KOREGAONWADI, TQ.OMERGA, DIST.OSMANABAD | OSMANABAD | Unaided - Private | PHARMACY | Maharashtra State Board of Technical Education, Mumbai | DIPLOMA | PHARMACY | 1st Shift | FULL TIME | 0 | 60 |
| 3 | 1-3508836522 | K.K.WAGH EDUCATION SOCIETY, NASHIK | K.K.WAGH INSTITUTE OF PHARMACY | AT POST CHANDORI, TAL NIPHAD, DIST NASHIK | NASHIK | Unaided - Private | PHARMACY | Maharashtra State Board of Technical Education, Mumbai | DIPLOMA | PHARMACY | 1st Shift | FULL TIME | 0 | 60 |
| 4 | 1-3515260145 | ARMED FORCES MEDICAL COLLEGE | DEPARTMENT OF PHARMACY | AFMC SHOLAPUR ROAD | PUNE | Government | PHARMACY | Maharashtra State Board of Technical Education, Mumbai | DIPLOMA | PHARMACY | 1st Shift | FULL TIME | 0 | 60 |
| 5 | 1-3628655651 | GRAMIN SAMAJSEVI SANSTHA | DR KOLPE INSTITUTE OF PHARMACY | AT POST-KOLPEWADI TAL-KOPERGAON DIST-AHMEDNAGAR MAHARASHTRA 423602 | AHMEDNAGAR | Unaided - Private | PHARMACY | Maharashtra State Board of Technical Education, Mumbai | DIPLOMA | PHARMACY | 1st Shift | FULL TIME | 0 | 60 |
| 6 | 1-3724468381 | BHARAT SHIKSHAN SANSTHA | TATYARAOJI MORE COLLEGE OF PHARMACY | OMERGA DIST. OSMANABAD | OSMANABAD | Unaided - Private | PHARMACY | Maharashtra State Board of Technical Education, Mumbai | DIPLOMA | PHARMACY | 1st Shift | FULL TIME | 0 | 60 |
| 7 | 1-3673270251 | GUNAI SHIKSHAN PRASARAK MANDAL | S.R. INSTITUTE OF DIPLOMA IN PHARMACY | AT SURVEY NO 211/3,MAUZA UDGIR TAHSIL UDGIR DIST LATUR | LATUR | Unaided - Private | PHARMACY | Maharashtra State Board of Technical Education, Mumbai | DIPLOMA | PHARMACY | 1st Shift | FULL TIME | 0 | 60 |
| 8 | 1-3673890091 | NIRMAL KRIDA AND SAMAJ PRABODHAN TRUST | INSTITUTE OF PHARMACY | PATHRIKAR CAMPUS HIGHWAY NO 06 AURANGABAD-JALNA ROAD BADNAPUR | JALNA | Unaided - Private | PHARMACY | Maharashtra State Board of Technical Education, Mumbai | DIPLOMA | PHARMACY | 1st Shift | FULL TIME | 0 | 60 |